**माहिती अधिकार अधिनियम २००५ च्या अंमलबजावणीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१५ /प्र.क्र.( २२१/१५) सहा.**
मंत्रालय, मुंबई - ४००० ३२.
दिनांक- २६.१०.२०१५.

**पहा- मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे दि. २.७.२०१५ चे आदेश.**

परिपत्रक:-

माहिती अधिकारातील अनेक प्रकरणात अर्जदारांनी अभिलेख तपासण्याची मागणी केलेली नसतानाही अर्जदारांना कार्यालयात अभिलेख तपासण्यासाठी जन माहिती अधिकाऱ्यांकडून बोलाविले जाते. त्यांच्याकडे कागदपत्राचे गठ्ठे ठेऊन त्यांना माहिती शोधण्यास सांगण्यात येते अशी तक्रार श्री. शैलेश गांधी यांनी मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचेकडे दि.२१.९.२०१५ रोजी केली होती. या प्रकरणी आवश्यक सूचना देणारे परिपत्रक सर्व शासकीय कार्यालयासाठी निर्गमित करावे असे आदेश मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त यांनी माहिती अधिकार अधिनियम २००५ मधील कलम १९ (८) (क) नुसार दि. २.७.२०१५ रोजी दिले आहेत. या अनुषंगाने सर्व विभागांना सूचित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदनुसार शासन पुढीलप्रमाणे सूचित करीत आहे.

२. उपरोक्त पार्श्वभूमी लक्षात घेता, माहिती अधिकार अधिनियम २००५ अन्वये माहिती मिळण्यासाठी अर्जदाराने मागणी केलेली माहिती व्यापक स्वरूपाची (voluminous) नसेल तर अर्जदारास कार्यालयात अभिलेख तपासण्यासाठी बोलाविण्यात येऊ नये. अशा प्रकरणात अर्जदाराने मागीतलेली माहिती, अर्जदारास विहित शुल्क आकारून उपलब्ध करून देण्यात यावी.

३. अर्जदाराने मागणी केलेली माहिती फारच व्यापक (voluminous) स्वरूपाची असेल तर ती पाहण्याची व तपासण्याची संधी देऊन अर्जदारास आवश्यक असलेल्या कागदपत्राच्या प्रती विहित शुल्क आकारून उपलब्ध करून देण्यात यावी.

४. अर्जदाराने मागणी केलेली माहिती व्यापक स्वरूपाची (voluminous) असेल तर किंवा त्याने अभिलेख तपासणीसाठी अर्ज केलेला असेल अशावेळी अर्जदारास अभिलेख तपासण्यास बोलाविण्यापूर्वी त्या अभिलेख्यांची एक निर्देशसूची तयार करावी व संबंधीत धारिकेतील पृष्ठांना क्रमांक देण्यात यावेत. अर्जदारास अभिलेख तपासण्यास बोलाविताना सोयीची वेळ तसेच तीन तारखा कळविण्यात याव्यात. सदर वेळ वा तारखा अर्जदारास सोयीची नसल्यास त्याला संबंधीत जन माहिती अधिकाऱ्यास संपर्क करण्यास कळविण्यात यावे.

५. अर्जदार अभिलेख तपासण्यासाठी येणार असलेल्या दिनांकास संबंधीत जन माहिती अधिकाऱ्यास महत्वाच्या कारणास्तव कार्यालयाबाहेर जावे लागणार असल्यास त्याने त्याच्या सहकारी अधिकारी किंवा अधिपत्याखालील कर्मचाऱ्याकडे अभिलेख तपासणीसाठी देण्याची जबाबदारी सोपवावी.

६. उपरोक्त परिपत्रकातील तरतूदी सर्व मंत्रालयीन विभाग प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, सार्वजनीक प्राधिकरण तसेच सर्व संबंधीतांच्या निदर्शनास आणून द्याव्यात व तदनुसर आवश्यक कार्यवाही करण्याबाबत त्यांना सूचित करण्यात यावे.

७. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५१०२६१५१९३३१००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Rajendra Shivanand Arwari

Digitally signed by Rajendra Shivanand Arwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Shivanand Arwari
Date: 2015.10.26 15:20:42 +05'30'

**(रा.शि.अरवारी)**
**शासनाचे अवर सचिव.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री / मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव.
३) सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य मुंबई.
५) सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य मुंबई.
६) *प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
११) मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१३) सर्व मंत्रालयीन विभाग (प्रशासकीय अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह )
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) महासंचालक, यशदा, पुणे
१६) सर्व जिल्हाधिकारी
१७) निवडनस्ती, सा.प्र.वि. कार्यासन सहा.

**<u>*पत्राने</u>**